शालेय शिक्षण व क्रीडा विभागांतर्गत (खुद्द) करिता
“ खरेदी समिती” गठीत करण्याबाबत....

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र.खरेदी-२०१८/प्र.क्र.१६/नोंदणी शाखा**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक :- १० ऑक्टोबर,२०१८**

**वाचा** :- १) उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/भाग- III/उद्योग-४, दि.३०ऑक्टोबर, २०१५ व दि.०१ डिसेंबर, २०१६

२) मा. अप्पर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे अर्धशासकीय पत्र क्र.अ.शा.प.क्र.उसं /भांख /GeM /२०१८ /२०१५ /१७ /उ-४, दि.१९.०९.२०१८

**शासन निर्णय** :-

उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भ क्र.१ येथील दिनांक ३०.१०.२०१५ व दि.०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेतील प्रकरण क्रमांक २ मधील क्र.२.९.३ मध्ये घालून देण्यात आलेल्या कार्यपद्धतीनुसार शालेय शिक्षण व क्रीडा विभागासाठी (खुद्द) कार्यालयीन खरेदीसाठीची खरेदी प्रक्रीया राबविण्यासाठी या आधीची खरेदीसमिती अधिक्रमित करुन खालीलप्रमाणे **“ खरेदी समिती ”** गठीत करण्यात येत आहे.

| | | | |
|---|---|---|---|
| १. | उप/सह सचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | - | अध्यक्ष |
| २. | कक्ष अधिकारी/ अवर सचिव,(रोख शाखा) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | - | सदस्य |
| ३. | कक्ष अधिकारी/अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | - | सदस्य |
| ४. | कक्ष अधिकारी/ अवर सचिव (नोंदणी शाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग | - | सदस्य सचिव |
| ५. | लेखा व कोषागार संचालनालयातील गट-अ किंवा गट-ब दर्जाचा लेखाधिकारी | - | निमंत्रित |
| ६. | उद्योग सह संचालक (भांख)/उद्योग संचालनालयाचा प्रतिनिधी | - | निमंत्रित |

**२.** उपरोक्त समितीने उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधीन दिनांक ३०.१०.२०१५ व दि.०१.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीचा अवलंब करुन योग्य तो निर्णय घ्यावा. जर खरेदीचे अंदाजित मूल्य रुपये १० लाखापेक्षा कमी असेल तर, विभाग प्रमुख म्हणून मा.सचिव/मा.प्रधान सचिव/मा.अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांना खरेदी संबंधी “खरेदी समितीची” बैठक न बोलविता निर्णय घेण्याचा अधिकार राहील.

३. याबाबतीत कोणतीही तफावत असल्यास विकास आयुक्त (उद्योग) यांचे मार्गदर्शन घेणे आवश्यक राहील. खरेदी समिती ही खरेदी प्रक्रीयेच्या सर्व टप्प्यांची म्हणजे तपशीलवार वैशिष्टयांना अंतीम स्वरुप देण्यापासून ते निविदा प्रक्रियेनंतरच्या सर्व निर्णयासाठी जबाबदार राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१०१०१६३५१३८८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.10.10 16:40:16 +05'30'

**(र.प्र.आटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अप्पर मुख्य सचिव (शा.शि.व क्री.वि.), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. अप्पर मुख्य सचिव (उद्योग) उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
३. सहसचिव (प्रशा.) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
४. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व अधिदान कार्यालय, मुंबई.
५. सर्व सह /उपसचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. सर्व अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
७. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. कक्ष अधिकारी (लेखाशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. निवडनस्ती (नोंदणी शाखा)